ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) ब वर्ग दर्जा प्राप्त तीर्थक्षेत्रांतर्गत काम पूर्ण झालेल्या कामांचा निधी वितरीत करणेबाबत.
( जिल्हा परिषद, सोलापूर )

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२४/प्र.क्र.५४/यो-११

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१

**दिनांक: ३० मार्च, २०२४**

**वाचा:-**

१) ग्रामविकास विभाग,शासन निर्णय क्र. तीर्थवि-२०२३/प्र.क्र.१२२/योजना-६,दि.३१.०३.२०२३.
२) कार्यकारी अभियंता(बां.),जि.प.सोलापूर यांचे जा.क्र.जिपसो/बांखा-२/प्रकल्प-१/१५२/२०२४ दि.२८.३.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) योजनेंतर्गत उपरोक्त शासन निर्णय क्र.०१ अन्वये सोलापूर जिल्ह्यातील ब-वर्ग तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी करण्यात येणाऱ्या विकास कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार संदर्भ क्र.२ अन्वये प्राप्त प्रस्तावानुसार झालेल्या कामांचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) ३१ सहायक अनुदान या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात एकूण रु.१५०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीतून जिल्हा परिषद, सोलापूर यांच्याकडून संदर्भिय पत्र क्र.२ नुसार सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या तीर्थक्षेत्राच्या प्राप्त देयकांसाठी प्राप्त देयकांसाठी **रु. १,८५,५४,६५१/- ( रुपये एक कोटी पंचाऐंशी लक्ष चौपन्न हजार सहाशे एकावन्न फक्त )** इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांना वितरीत करण्यात येत आहेत. सोबत देयकांचे विवरणपत्र जोडले आहे.

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी सदर निधी वितरीत करताना संदर्भाधिन क्रमांक १ येथील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

३. सदर अनुदान मागणी क्र.एल-०३ "२५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६-जिल्हापरिषद/जिल्हास्तरीय पंचायतींना सहाय्य (००) (०८) ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम (२५१५ २५६६) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) (दत्तमत) या

लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. वरीलप्रमाणे ज्या कामाच्या प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करून दिलेला आहे, तो त्याच कामावर तात्काळ खर्च करून, सदर सहायक अनुदानाच्या विनियोजनासंबधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे, महालेखापाल कार्यालय, मुंबई व विभागास पाठविण्यात यावी.

५. सदर निधी नियोजन विभागाचा अनौ. संदर्भ क्र.८२/१४४४ दि.१६/०२/२०२४ व वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१८०/२०२४/व्यय-१५ दि.२३/०२/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार वितरीत करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२ एप्रिल, २०२३ अन्वये अटीची व शर्तीची पूर्तता करून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202403301723477120 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.04.01 12:32:54 +05'30'

**(का.गो. वळवी)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मलबार हिल, मुंबई.
२) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
५) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे.
६) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
१०) नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
११) वित्त विभाग (व्यय १५, अर्थसं १६, अर्थसं १७) मंत्रालय,मुंबई ३२.
१२) कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (का.यो-११), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्र.तीर्थवि-२०२४/प्र.क्र.५४/यो-११, दि.३० मार्च, २०२४ सोबतचे विवरणपत्र :-**

**सोलापूर जिल्हयातील (जि.प.) ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेंतर्गत मंजूर झालेल्या कामांकरिता देयकांचे विवरणपत्र**

| अ क्र | तीर्थक्षेत्राचे नाव | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | कामांचे नाव | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | श्री क्षेत्र कामसिध्द देवस्थान, खोमनाळ, ता. मंगळवेढा, जि. सोलापूर | तीर्थवि-२०२३/ प्र.क्र. १२२ / योजना-६ दि.३१.०३.२०२३ | १. पुरुष भक्त निवास बांधणे | ६५१४८१०/- |
| २. | श्री क्षेत्र कामसिध्द देवस्थान, हिवरगाव, ता. मंगळवेढा, जि.सोलापूर | तीर्थवि-२०२३/ प्र.क्र. १२२ / योजना-६ दि.३१.०३.२०२३ | १. पुरुष भक्त निवास बांधणे | ६६६५५६८/- |
| | | | २. स्त्री भक्त निवास बांधणे | २५७०४७३/- |
| | | | ३. महिला व पुरुष शौचालय बांधणे | १९८९५३७/- |
| | | | ४. वाहनतळ बांधणे | ८१४२६३/- |
| | | **एकूण** | | **१८५५४६५१/-** |